**अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांच्या मान्यतेस अनुसरुन, तंत्रशिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील मुंबई विभागातील, विद्यमान विनाअनुदानित शैक्षणिक संस्थांच्या नावात बदल करण्यास शैक्षणिक वर्ष २०२५-२६ पासून शासन मान्यता देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्रशिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र.मान्यता-२०२५/प्र.क्र.१५२/तांशि-४**
मादाम कामा रोड, हुतात्मा चौक राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: १३ जून, २०२५.

**संदर्भ :-** संचालक, तंत्र शिक्षण यांचे पत्र क्र.२/एनजीसी/एआयसीटीई-संस्थेच्या नावात बदल/ मुंबई/३६४, दि.१५.०५.२०२५.

**प्रस्तावना :-**

अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी दिलेल्या मान्यतेस अनुसरुन, संचालक, तंत्रशिक्षण यांनी उपरोक्त संदर्भाधीन पत्रान्वये, तंत्रशिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील मुंबई विभागातील, विद्यमान विनाअनुदानित शैक्षणिक संस्थांच्या नावात बदल करण्यास शैक्षणिक वर्ष २०२५-२६ पासून मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव सादर केला आहे. त्यानुसार मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी दिलेल्या मान्यतेस अनुसरून व संचालक, तंत्र शिक्षण यांनी सादर केलेल्या प्रस्तावानुसार, तंत्र शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील **मुंबई विभागातील**, सोबतच्या **"प्रपत्रामध्ये"** दर्शविलेल्या, विद्यमान विनाअनुदानित शैक्षणिक **संस्थांच्या नावात बदल करण्यास**, शैक्षणिक वर्ष २०२५-२६ पासून खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती :-**

१) सदर मान्यता ही, उक्त संस्था/ महाविद्यालय सुरु करण्यास शासन मान्यता दिलेल्या मूळ शासन निर्णय/ आदेशातील अटी व शर्तींच्या अधीन राहील.

२) उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या शासन निर्णय दि.२२.०२.२०१८ अन्वये विहित केलेले नोंदणी शुल्क संबंधित संस्था/ महाविद्यालयाने भरणा केले नसेल, तर ते संबंधित सहसंचालक, तंत्र शिक्षण विभागीय कार्यालय यांनी संबंधित संस्था/ महाविद्यालयाकडून भरणा करुन घ्यावे.

२.	याशिवाय संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई व संबंधित विद्यापीठ यांनी घालून दिलेल्या अन्य अटी व शर्ती संस्था/ महाविद्यालयावर बंधनकारक राहतील.

३.	हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०६१३१६०२३५०४०८ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

THORAT AJITKUMAR ARUNRAO

Digitally signed by THORAT AJITKUMAR ARUNRAO
DN: CN = THORAT AJITKUMAR ARUNRAO, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT
Date: 2025.06.13 16:04:22 +05'30'

**(अजितकुमार थोरात)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३) संबंधित सहसंचालक, तंत्र शिक्षण विभागीय कार्यालय, (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत).
४) कुलसचिव, संबंधित विद्यापीठ (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
५) संबंधित संस्था/ महाविद्यालय (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
६) निवडनस्ती (तांशि-४)

प्रपत्र

Higher and Technical Education Dept. G.R.No.Manyata-2025/C.R.152/TE-4, Dated: 13th June, 2025

List of Change in the Name of Institutes approved by AICTE from AY 2025-26

| Sr.No | Code | Region | PermanentId | Institute Name - Old | Institute Name - New | InstituteAddress | District |
|---|---|---|---|---|---|---|---|
| 1 | 3699 | Mumbai | 1-44521138294 | VINAYAK GANESH VAZE COLLEGE OF ARTS SCIENCE AND COMMERCE | VINAYAK GANESH VAZE COLLEGE OF ARTS, SCIENCE & COMMERCE (AUTONOMOUS) | MITHGAR ROAD MULUND EAST | MUMBAI SUBURBAN |
| 2 | .. | Mumbai | 1-44651683386 | YASHWANTRAO BHONSALE INSTITUTE OF TECHNOLOGY | YASHWANTRAO BHONSALE INSTITUTE OF TECHNOLOGY AND MANAGEMENT | BHONSALE KNOWLEDGE CITY CHARATHE VAZARWADI TAL SAWANTWADI | SINDHUDURG |

THORAT AJITKUMAR ARUNRAO

Digitally signed by THORAT AJITKUMAR ARUNRAO
DN: CN = THORAT AJITKUMAR ARUNRAO, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT
Date: 2025.06.13 16:04:30 +05'30'